**“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालयास निधी वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.४६४/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ मार्च, २०२४

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन पत्र क्र. संकिर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, दि. १७ फेब्रुवारी, २०२३
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन पत्र क्र. संकिर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, दि. २६ डिसेंबर, २०२३
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. स्वाअम-२०२३/प्र.क्र.४४/सां.का.३, दि. १४ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ५ डिसेंबर, २०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र. १ व २ येथील पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवा निमित्त “परिसंवाद आयोजन, छायाचित्र प्रदर्शन, माहितीपट निर्मिती, पुरातनवस्तूचे थ्रीडी स्कॅनिंग व प्रिंटिंग, डॉक्युमेंटेशन” करीता एकूण रुपये ४३.३६ कोटी इतका निधी आणि इतर संरक्षित स्मारकांचे जतन व संवर्धन प्रकल्प याकरीता रुपये ९०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

त्यानुसार उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील शासन निर्णयांन्वये राज्य संरक्षित स्मारके व शासकीय वस्तुसंग्रहालये यावर माहितीपट तयार करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एक छत्र योजनेंतर्गत पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयाकडून राज्य संरक्षित स्मारके व शासकीय वस्तुसंग्रहालये यावर माहितीपट तयार करण्याकरीता रुपये १४,२२,१३,५००/- (रुपये चौदा कोटी बावीस लक्ष तेरा हजार पाचशे फक्त) (सर्व करांसह) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती , (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, त्यांना संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे कार्यालयातील अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी सदर प्रयोजनार्थाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करावे. तसेच, वेळोवेळी प्रगती अहवाल संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित यंत्रणा यांची राहील. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ११५ (अ)/१४४३ दिनांक १०.०३.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ १४२/ व्यय १५ दिनांक २३.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१११२११३१३५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.12 14:38:12 +05'30'

**(अनिरुध्द सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव ( सां.का.३, ४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
५. संचालक, पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
७. कक्ष अधिकारी (सां. का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१४. निवड नस्ती, सां.का.४.